आदिवासी क्षेत्र उपयोजनाआदिवासी / क्षेत्राबाहेरील उपयोजना सन २०१४-१५ चे राज्यस्तरीय योजनानिहाय अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या **"महिला व बाल विकास"** या उपशिर्षाखालील तरतूदीचे वाटप

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१४/प्र.क्र.१०/कार्यासन.६**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

तारीख: १६ फेब्रुवारी,२०१५

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं- २०.१४/प्र.क्र.६६/अर्थ-३, दि.२९.३.२०१४.

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज- २०.१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.०१.०७.२०१४.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अंदाज- २०१३/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.०२.०१.२०१५.

४) महिला व बाल विकास विभागाची नस्ती क्र.एबावि २०१४/प्र.क्र.१५८/कार्यासन-५

**शासन निर्णय -**

आदिवासी उपयोजनांतर्गत **"महिला व बाल विकास"** या उपशिर्षाखाली सन २०१४-१५ च्या अर्थसंकल्पीय अंदाजपत्रकात समाविष्ट करण्यात आलेल्या तरतुदीचे योजनानिहाय वाटप आणि नियंत्रण अधिकारी सोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविले आहेत. आदिवासी उपयोजनेंतर्गत आदिवासी प्रकल्पातील ४५३७ अंगणवाडयांमध्ये माता बैठका घेण्यासाठी रु.३६.३० लक्ष एवढा निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. सन २०१४-२०१५ करिताच्या अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी एप्रिल,२०१४ ते मार्च,२०१५ या आर्थिक वर्षाकरिता खर्च भागविण्यासाठी सोबतच्या विवरण पत्रातील स्तंभ क्रमांक २ मध्ये **"महिला व बाल विकास"** या उपशिर्षाखाली २०१४-१५ च्या अर्थसंकल्पीय अंदाजात समाविष्ट करण्यात आलेल्या योजनानिहाय एप्रिल,२०१४ ते मार्च,२०१५ या आर्थिक वर्षाकरीता तरतूद दर्शविण्यात आली आहे. सदर तरतूद सन २०१४-१५ या चालू आर्थिक वर्षाकरीता खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे. यासाठी उपलब्ध करून देण्यात आलेली तरतूद एप्रिल,२०१४ ते मार्च,२०१५ या आर्थिक वर्षाकरीता संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध कॅश फ्लो प्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी. तसेच सदर खर्च मासिक निधी विवरणपत्रानुसार खर्च करावा. मासिक विवरणपत्रानुसारचा निधी एप्रिल ते मार्च या कालावधीमध्ये पुढे-मागे ओढून घेण्याची सुविधा अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.त्याचप्रमाणे सर्व नियंत्रक अधिकारी / अंमलबजावणी अधिकारी यांनी सदर तरतूदी खर्च करतांना वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.०२.०१.२०१५ च्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. नियंत्रण अधिकारी आणि विभागप्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी.

४. आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरिता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लोकांकरिता खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेत केलेली तरतूद खर्च झाली नाही तर सदर तरतूद प्रत्यार्पित करावी व कोणत्याही परिस्थितीत आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च करण्यात येवू नये. जर आदिवासी उपयोजनेची तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर खर्च झालेली आढळल्यास याबाबत सबंधित क्षेत्रिय अधिकारी, यांना जबाबदार धरण्यात येईल. तसेच आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल लेखाशिर्षनिहाय/उप लेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती सबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, महिला व बाल विकास विभाग व आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत न चुकता पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल व तो केंद्रशासनाला कळविता येईल.

६. नियंत्रण अधिकारी/विभाग प्रमुख यांनी प्रचलित नियम प्रचलित कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन उपरोक्त परिच्छेद क्र ४. मधील सूचनानुसार खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

७. आदिवासी उपयोजनेअंतर्गत आदिवासी क्षेत्र उपयोजना (टिएसपी) व आदिवासी क्षेत्राबाहेरील उपयोजना (ओटिएसपी) यांचा खर्च स्वतंत्रपणे नोंदविण्यासाठी लेखाशिर्षामध्ये काही बदल करण्यात

आले असल्यास हे बदल लक्षात घेवून खर्च नोंदविताना सुधारित लेखाशिर्ष नोंदविण्याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२१६१४४११०७६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Naik Suresh D

Digitally signed by Naik Suresh D
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=MTD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Naik Suresh D
Date: 2015.02.16 18:54:45 +05'30'

**( सु. द. नाईक )**
**कार्यासन अधिकारी**

प्रत,

१. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

२. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

३. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

४. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

५. वित्त विभाग (अर्थसकल्प-१९), मंत्रालय, मुंबई-३२

६. महिला व बाल विकास,(कार्यासन-५), नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला, मुंबई

७. कार्यासन अधिकारी (का.क्र. २, ८ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

८. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग

## आदिवासी क्षेत्र उपयोजनेखालील २०१४-१५ चे अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप (टि.एस.पी.) (रु.हजारात)

<table>
<tr><td colspan="2">शिर्ष :- महिला व बाल विकास<br>योजनेचे नांव :- महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ याच्य कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदाने<br>(राज्यस्तर योजना)</td><td colspan="3">मागणी क्रमांक :- टी- ५<br>मुख्य लेखाशिर्ष :- २२३६-पोषण आहार-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- ०२, पोषक अन्न व पेय वितरण ७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम,१९६१ याच्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदाने<br>(२२३६ ०२९७) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)</td></tr>
<tr><td>जिल्हयाचे नांव</td><td>२०१४-१५ साठी केलेली तरतूद</td><td>२०१४-१५ ची अर्थसंकल्पीय तरतूद सुर्पूद करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी</td><td>प्रशासकीय विभाग</td><td>शेरा</td></tr>
<tr><td>१</td><td>२</td><td>३</td><td>४</td><td>५</td></tr>
<tr><td>एकुण</td><td>३६३०</td><td>प्रधान सचिव,<br>महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई</td><td>महिला व बाल विकास विभाग,<br>मंत्रालय, मुंबई</td><td></td></tr>
</table>

----------------------